**कोयना जलविद्युत प्रकल्प टप्पा-४**
**तज्ञ समितीस (Panel of Experts)**
**मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
जलसंपदा विभाग,
शासन निर्णय क्रमांकः कोयना-१२०९/(१७८/०९) जवि.
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांकः ०९/१२/२००९.

पहा : १) शासन निर्णय, पाटबंधारे विभाग,क्र-केओवाय-१०८७/(२६९/८७) जवि, दि. २३.६.१९८८.
२) शासन निर्णय, पाटबंधारे विभाग, क्र-कोयना-०२/(२२७/०२) जवि, दि. १२.१२.२००२.
३) शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्र-कोयना-१२०४/(२१९/०४) जवि, दि. २२.२.२००५
४) शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्र-कोयना-१२०५/(२११/०५) जवि, दि. ९.६.२००५.
५) शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्र-कोयना-१२०७/(२००/०७) जवि.दि.१३.९.२००७.
६) शासन निर्णय, जलसंपदा विभाग,क्र- कोयना-१२०७/(२००/०७)जवि. दि.०४.०९.२००८.

**प्रस्तावना :**

कोयना जलविद्युत प्रकल्प टप्पा-४ या प्रकल्पाच्या कामाची व्याप्ती व महत्व लक्षात घेता, या प्रकल्पाची स्थापत्य व विद्युत कामे प्रकल्प अधिका-यांमार्फत तांत्रिकदृष्टया अचूकपणे पार पाडण्याच्या दृष्टीने आढावा घेण्यासाठी तसेच मार्गदर्शन व सल्ला देण्यासाठी शासन निर्णय, पाटबंधारे विभाग, क्रमांक-केओवाय-१०८७/(२६९/८७)जवि, दि.२३.६.१९८८ अन्वये तज्ञ समितीची नियुक्ती करण्यात आली आहे. सदर समितीचे शासन निर्णय, क्रमांकः कोयना-१२०७/(२००/०७)जवि. दि.१३.९.२००७अन्वये पुनर्गठन करण्यात आले असून, त्यामध्ये जलविद्युत प्रकल्पांच्या बांधकामातील नामांकित तज्ञ, विद्युत व यांत्रिकी क्षेत्रातील तज्ञ तसेच वरिष्ठ भूगर्भशास्त्रज्ञ यांचा समावेश आहे.

या तज्ञ समितीची मुदत प्रथमतः दि. ३१.३.१९९३ पर्यंत होती. त्यानंतर समितीस वेळोवेळी मुदतवाढ देण्यात आली असून, शासन निर्णय,क्रमांक-कोयना-१२०७/(२००/०७)जवि, दिनांक ०४.०९.२००८ अन्वये कोयना धरण पायथा विद्युतगृह (डावा ंतीर) या प्रकल्पावरील द्वारयुक्त बंधाऱ्याच्या कामासहित सर्व कामे व अधिजल भुयार विस्तारीकरण ही कामे या तज्ञ समितीच्या कार्यकक्षेत समाविष्ट करुन समितीस दि. ३१.०८.२००९ पर्यंत अंतिम मुदतवाढ देण्यात आली होती.

कोयना जलविद्युत प्रकल्प टप्पा-४ अंतर्गत अधिजल भूयार विस्तारीकरणाचे काम अंतिम टप्प्यात सुरु आहे. या प्रकल्पामधील जुन्या व नव्या अधिजल भुयाराच्या दोन ठिकाणाच्या जोडांची कामे व जलाशय छेदनाचे काम (Lake Tap) ही कामें तांत्रिकदृष्टया अत्यंत क्लिष्ट स्वरुपाची आहेत. तसेच, कोयना धरण पायथा विद्युतगृह (डावा ंतीर) (२ × ४० मे.वॅट) या प्रकल्पाचे नियोजन व संकल्पन तयार करण्याची कामे वेगाने प्रगतीपथावर आहेत. या सर्व कामांकरिता तज्ञ समितीचे मार्गदर्शन आवश्यक आहे. ही वस्तुंस्थिती विचारात घेता, सदर तज्ञ समितीस आणखी काही कालावधीसाठी मुदतवाढ देणेबाबतचा, प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

कोयना जलविद्युत प्रकल्प टप्पा-४ च्या स्थापत्य व विद्युत कामांकरिता प्रकल्प अधिका-यांना सल्ला देण्यासाठी व मार्गदर्शन करण्यासाठी नियुक्त करण्यात आलेल्या तज्ञ Panel of Experts समितीस दि. ३०.११.२०१० पर्यंत मुदतवाढ देण्यास शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

समितीच्या सदस्यांना शासन निर्णय क्र-कोयना १२०४/(२१९/०४)/जवि दि २२.५.२००५ मधील तरतुदीनुसार कामकाजाच्या प्रत्येक दिवसाकरिता रु ४०००/- व अनुज्ञेय प्रवासभत्ता इतके मानधन अनुज्ञेय असेल.याबाबतचा खर्च कोयना जलविद्युत प्रकल्पाकरिता मंजुर असलेल्या अनुदानातुन भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४७२/व्यय-१२ दि. ३०.११.२००९ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २००९१२०९१५४९५४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(सु. रा. बावस्कर)
शासनाचे अवर सचिव

प्रत

महालेखापाल (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र,मुंबई/नागपूर
मुख्य अभियंता, कोयना प्रकल्प,पुणे
मुख्य अभियंता (विद्युत) जलविद्युत प्रकल्प,मुंबई
मुख्य अभियंता (विद्युत), महाराष्ट्र राज्य, विद्युत निर्मिती कंपनी लि, मुंबई
श्री. श्री.ना.हुद्दार, नवीन अजंठा ॲव्हेन्यू, पौंड रोड, कोथरुड, पुणे-४११ ०२९.
श्री. डी.जी.कडकडे, बी-२३ वसंत विहार, नवी दिल्ली-११० ०५७.
श्री. क.शा.देशपांडे,सूरजश्री सोसायटी,१३/६,सर्व्हे नं.३९,गुजराथ कॉलनी,कोथरुड,पुणे ४११०२९.
श्री.एस.आर.कुलकर्णी, ११५१,केशव लक्ष्मी ऑफिस सोसायटी, पेरुगेट समोर, पुणे ४११०३०,
संचालक, केंद्रीय जल व विद्युत संशोधन केंद्र, खडकवासला,पुणे
मुख्य केंद्र अधीक्षक (कोयना) महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी लि. पोफळी, जि. रत्नागिरी.
आयुक्त, पुणे विभाग, पुणे
जिल्हाधिकारी सातारा/रत्नागिरी/कोल्हापूर
महासंचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन प्रबोधिनी संस्था, नाशिक
अधीक्षक अभियंता, कोयना बांधकाम मंडळ, सातारा
अधीक्षक अभियंता, कोयना संकल्पचित्र मंडळ, पुणे
अधीक्षक अभियंता, मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना (विद्युतगृहे), नाशिक
अधीक्षक अभियंता, कोयना (वि. व यां.) संकल्पचित्र मंडळ,पुणे
संगणक कक्ष, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
ज.वि. कार्यासन संग्रहार्थ.